कोल्हापूर जिल्हा कारागृहाची [शहर] ढासळलेली तटभिंत नव्याने बांधण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

---

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र. बीएलडी-२०९४/२[१०४]/पीआरएस-२.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक:- २३ मार्च १९९९.

वाचा:- १] कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. बीएलडी-२८९४/३३६३/क-३, दिनांक २.७.१९९८.

२] शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-१०९२/प्र.क्र. ११३/९२/विनियम/दिनांक १.६.१९९२.

शासन निर्णय:- कोल्हापूर जिल्हा कारागृह [शहर] येथील पूर्व बाजूची तटभिंत ही ५० मिटर लांबीची दगड व मातीने बांधलेली जुनी भिंत असून पावसामुळे कांही ठिकाणी कोसळली असून त्यामुळे कारागृहाच्या सुरक्षिततेला धोका निर्माण झाला आहे. तरी, त्याची नव्याने पुनर्बांधणी करण्यासाठी शासनास प्रशासकीय मान्यतेकरिता कारागृह महानिरीक्षक यांनी प्रस्ताव सादर केला असून त्यासाठी येणा-या खर्चास रु.४,४३,५००/- [चार लक्ष त्रेचाळीस हजार पाचशे फक्त] इतक्या अनुदानास/प्रशासकीय मान्यता द्यावी अशी शासनास विनंती केली आहे.

२. कोल्हापूर जिल्हा कारागृहाची [शहर] ढासळलेली तटभिंत बांधणेस व त्यासाठी येणा-या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव कांही काळ शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावाचा शासनाने काळजीपूर्वक विचार करुन, शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-१०९२/प्र.क्र. ११३/९२/विनियम/दिनांक १.६.९२ प्रशासकीय व वित्तीय अधिकाराचे प्रदान, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उप विभाग पांच सार्वजनिक बांधकाम विभाग नियम पुस्तिकेच्या नियमावलीखाली प्रदान करण्यांत आलेले अधिकार अ.क्र. १ सार्वजनिक बांधकाम विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ च्या विवरणपत्रातील संबंधित अटींच्या अधिन राहून सदर प्रस्तावास व त्यासाठी येणा-या खर्चास [रु.४,४३,५००/-] शासन या आदेशाद्वारे प्रशासकीय मान्यता देत आहे.

३. कारागृह विभागाने यापूर्वी प्रशासकीय मान्यता दिलेली प्रकरणे प्रथम प्राधान्याने हाताळावीत व नंतरच या कामास सुरुवात करण्यांत यावी. या कामासाठी प्रस्तावित केलेल्या अनुदानाची तरतूद प्रत्यक्ष अर्थसंकल्पात झाल्याशिवाय सदर कामास सुरुवात करु नये. तरतूद केलेल्या अनुदानातून तटभिंतीच्या बांधकामाचा खर्च भागविण्यांत यावा. त्यासाठी अतिरिक्त अनुदान मंजूर करण्यांत येणार नाही.

.. २.

४. यासाठी होणारा खर्च मुख्य लेखाशिर्ष "४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-२०१-बांधकाम पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, तुरुंग" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा व आर्थिक वर्ष १९९९-२००० या वित्तीय वर्षात मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यांत यावा.

५. हा शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, नियोजन विभाग व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर-६४/९९/व्यय-८, दिनांक ८.३.९९ च्या मान्यतेने निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ गु.ज. कुलकर्णी ]
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक, [मुख्यालय] महाराष्ट्र राज्य, पुणे,

कारागृह उपमहानिरीक्षक, पश्चिम विभाग, पुणे.

जिल्हा कारागृह [शहर] अधिक्षक, कोल्हापूर.

महालेखापाल, महाराष्ट्र-१ [लेखा व अनुज्ञेयता] मुंबई.

महालेखापाल, महाराष्ट्र-१ [लेखा परिक्षा] मुंबई.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर.

वित्त विभाग [व्यय-८] मंत्रालय, मुंबई.

नियोजन विभाग, [का-१४५५] मंत्रालय, मुंबई.

सार्वजनिक बांधकाम विभाग [इमा-२] मंत्रालय, मुंबई.

कक्ष अधिकारी, गृह विभाग, [जोयुडी-१] मंत्रालय, मुंबई.

निवडनस्ती.